वासिली
सूखोम्लीन्स्की

# गाणारे पीस



## वासिली सूखोम्लीन्स्की

# गाणारे पीस

अनुवाद: अनिल हवालदार
चित्रे: वासिली शुल्झेनको







रादुगा प्रकाशन
मॉस्को



लोकवाङ्मय गृह प्रा. लि.
मुंबई

# मला काही सांगायचंय !

कातेरीना इवानोवना आपल्या पहिलीच्या वर्गातील मुलांना घेऊन मैदानावर गेल्या. शरदाच्या मोसमातील शांत सकाळ होती. दूर आकाशात स्थलांतर करणाऱ्या पक्ष्यांचा थवा उडत होता. पक्ष्यांचा किंचित कलकलाट चालला होता व त्यामुळे मैदानात खिन्न वातावरण पसरत होते.

कातेरीना इवानोवना मुलांना म्हणाल्या :

"आज आपण शरदातील आकाशावर आणि स्थलांतर करणाऱ्या पक्ष्यांवर निबंध लिहायचे. तुमच्यापैकी प्रत्येकानं सांगायचं— आज आकाश कसं दिसतंय ! मुलांनो, लक्षपूर्वक पहा. तुमच्या मायबोली-मधले सुंदर आणि अचूक शब्द निवडा."

मुले गप्प झाली. आकाशाकडे पहात विचार करू लागली. एक मिनिटानंतर पहिले छोटे निबंध ऐकू येऊ लागले :

"आकाश निळं निळं आहे..."

"आकाश फ़िकट निळं आहे..."

"आकाश स्वच्छ आहे..."

"आकाश फिकट जांभळं आहे..."

बस्स ! मुले परत परत हेच शब्द उच्चारत होती. निळे, फिकट निळे, फिकट जांभळे, स्वच्छ...

छोटी, निळ्या डोळ्यांची वालेंतिना एका बाजूला गप्प उभी होती.

"तू का गप्प, वाल्या ?"

"आकाश प्रेमळ आहे..." वालेंतिना हळूच म्हणाली आणि तिने खिन्न स्मित केले. मुले गप्प झाली. आणि दुसऱ्याच क्षणी त्यांना आत्तापर्यंत न दिसलेल्या गोष्टी आता दिसू लागल्या.

"आकाश दुःखी आहे..."

"आकाश संकटात आहे..."

"आकाश शोक करतंय..."

"आकाश गारठलंय..."

जिवंत माणसाप्रमाणे आकाश वेगवेगळे खेळ खेळत होते, चमकत होते, श्वासोच्छ्वास करीत होते. आणि मुले त्याच्या नितळ निळ्या शारदीय डोळ्यांकडे टक लावून पहात होती.



# ढगांच्या गडगडाटाला आणि विजांच्या चमचमाटाला मी घाबरत नाही!

जून महिन्यातील उकाड्याचा एक दिवस. पाचवीच्या वर्गातील मुले सबंध दिवसभर जंगलात सहलीला गेली होती.

जंगलात खूप मजा आली. मुले खेळत होती, छान छान पुस्तके वाचत होती, खीर बनवत होती.

संध्याकाळी अचानक जंगलामागून काळे ढग धावून आले. मोठा गडगडाट ऐकू आला. पावसापासून आडोसा घ्यायला मुले गुराख्यांच्या खोपटांकडे धावली. विक्तरसुद्धा धावला. एकदम वीज चमकली आणि एवढा प्रचंड कडकडाट झाला, की विक्तर घाबरून मटदिशी ओकच्या मोठ्या झाडाखाली बसला. त्याने डोळे गच्च मिटून घेतले. त्याला जवळ जवळ रडू कोसळले होते. मदतीसाठी हाक मारायला म्हणून त्याने तोंड उघडले, तेवढ्यात त्याच्या वर्गातील वालेंतिना त्याला दिसली.

"वीत्या, तू होय? मी एकटी नाही हे किती छान! आता मला भीती वाटत नाही."

विक्तरने श्वास घेतला, भोवती पाहिले. पावसाच्या धारांमध्ये जंगल चिप्प भिजत होते. वीज चमकली आणि क्षणभर तिच्या निळसर प्रकाशात झाडे व झुडुपे उजळली. जंगल डोलत होते, कण्हत होते. विक्तरला भास झाला की, जगात त्याच्याशिवाय आणि वालेंतिना-शिवाय दुसरे कुणीही नव्हते. घाबरण्याची त्याला लाज वाटली. जेव्हा तुझ्याजवळ एक मुलगी उभी असते आणि तिच्या रक्षणाची तुझ्यावर जबाबदारी असते, तेव्हा घाबरायचे असते का?

"भिऊ नको, वाल्या," विक्तर म्हणाला. "मी ढगांच्या गडगडाटाला आणि विजांच्या चमचमाटाला भीत नाही."

विक्तरने तिच्या सोनेरी वेणीवरून हात फिरवला. आता त्याला कशाचीही मुळीच भीती वाटत नव्हती.



# पेत्रिक का रडला ?

छोटचा पेत्रिकला आईने घरातच ठेवले आणि ती स्वत: बेकरीत पाव आणायला गेली.

पेत्रिक उघडचा खिडकीपाशी गेला.

खिडकीत फुलदाणी उभी होती.

एक मोठे रंगीबेरंगी फुलपाखरू फुलदाणीच्या कडेशी बसले. पेत्रिकला फुलपाखरू पकडायची इच्छा झाली. तो खिडकीच्या चौकटीवर चढला, त्याने हात पुढे केला आणि त्याचा फुलदाणीला धक्का लागला. फुलदाणी खाली पडली आणि फुटली.

पेत्रिक फार घाबरला. "आता काय होणार? आई काय म्हणेल?"

पेत्रिकने फुलदाणीचे फुटके तुकडे गोळा केले, त्यांना बागेत घेऊन गेला आणि छोटचा फावडचाने ते तुकडे त्याने जमिनीत पुरून टाकले. मग खिडकीपाशी परत येऊन बसला व आईची वाट पाहू लागला.

आई दार उघडून घरात आली तेव्हा पेत्रिक घाईघाईने पळत तिच्यापाशी गेला आणि म्हणाला :

"आई, मी फुलदाणी फोडली नाही, तिचे तुकडे बागेत नेले नाही आणि छोटचा फावडचानं त्यांना जमिनीत पुरलं नाही!"

आईच्या डोळयांमध्ये पेत्रिकला संकटाची चाहूल जाणवली.

"कुणी फोडली फुलदाणी?" आईने विचारले.

"फुलपाखरानं..." हळूच पेत्रिक उत्तरला.

आई किंचित हसली.

"फुलपाखरानं फुलदाणी फोडली हे समजण्यासारखं आहे..." ती म्हणाली. "पण फुटके तुकडे गोळा करून त्यांना बागेत नेऊन पुरणं फुलपाखराला कसं काय शक्य झालं?"

पेत्रिकने आईकडे पाहिले आणि तो रडू लागला.



# उत्तम काय?

एका छोटया मुलीला प्रश्न विचारायला फार आवडायचे.

"उत्तम काय?" ती आपल्या आईला विचारायची. "सफरचंद अथवा नासपाती? गुलाब अथवा ग्लॅडीओल? पाणी अथवा लेमोनेड? चेंडू अथवा बाहुली?"

आई सहनशीलपणे उत्तरे द्यायची, पण खरे म्हणजे तिला नेमके उत्तम काय ते माहीत नसायचे.

आणि प्रत्यक्षात उत्तर देणे शक्य आहे का – काय उत्तम: चेंडू अथवा बाहुली? गुलाब अथवा ग्लॅडीओल?

एकदा मुलीने विचारले:

"आई, उत्तम काय: परीकथा अथवा गाणं?"

"तू स्वतः विचार कर – काय उत्तम: सूर्य अथवा आकाश? जर ह्या प्रश्नाचं तू उत्तर दिलंस, तर परीकथा आणि गाणं ह्यांच्यात उत्तम काय ते मी सांगीन," आई म्हणाली.

मुलीने खूप वेळ विचार केला, पण तिला उत्तर सुचेना. आकाशाकडे आणि तेजस्वी सूर्याकडे ती टक लावून पहात राहिली. पण सूर्य आणि आकाश यांच्यात उत्तम काय ते ठरविणे अशक्य झाले. दोन्ही सुंदर होते आणि त्यांच्यात विभागणी करता येत नव्हती.

त्यानंतर मात्र 'उत्तम काय' हा प्रश्न विचारण्याचे त्या मुलीने थांबविले. ती दुसऱ्या पद्धतीने विचारू लागली: "परीकथेत छान काय आहे? गाण्यात छान काय आहे?"

आणि आई आनंदाने तिला उत्तरे देऊ लागली.

# फूल किंवा लांडग्याचा जबडा ?

दोन मुलगे शाळेतून घरी निघाले होते : सेर्गेइका आणि मिकोला.

सेर्गेइका मजेत होता. आज मास्तरीणबाईंनी त्याला तीन वेळ प्रश्न विचारले होते.

आणि त्याला पाचापैकी पाच गुण मिळाले होते.

पण मिकोला दु:खी होता आणि विचारात गुरफटला होता. दोनदा त्याला फळयापाशी बोलावण्यात आले होते. मिकोलाने अचूक उत्तरे दिली नव्हती आणि मास्तरीणबाईंनी त्याच्या शेरेवहीत दोन गुण दिले होते. शिवाय त्या म्हणाल्या होत्या :

"तुझी आई भेटली म्हणजे तुझ्या मार्कांबद्दल मी तिला सांगणार आहे."

वसंतामधील छान उबदार दिवस होता. सूर्य तळपत होता. निळया आकाशात शुभ्र पांढरा ढग तरंगत जात होता. सेर्गेइकाने ढगाकडे पाहिले व तो म्हणाला :

"बघ मिकोला, किती सुंदर ढग! पांढऱ्या गुलाबासारखा दिसतोय. बघ, त्याच्या नाजुक, निमुळत्या पाकळया उलगडल्या. वाऱ्याच्या झुळुकींबरोबर कशा थरथरताहेत!"

मिकोला ढगाकडे खूप वेळ पहात राहिला. मग हळूच पुटपुटला :

"कुठं आहेत पाकळया? कुठं आहे फूल? ढग एखाद्या लांडग्यासारखा दिसतोय. बघ, त्या बाजूला डोकं. जनावरानं जबडा उघडला— कुणावर तरी झडप घालायच्या तयारीत आहे."

मुले खूप वेळपर्यंत ढगाकडे पहात होती. प्रत्येकाला आपापल्या नजरेनुसार तो ढग दिसत होता.



# निळी पक्षीण का रडतेय ?

वस्तीच्या टोकापाशी एका घरात नवरा आणि बायको रहात होती. त्यांना दोन मुले होती – मुलगा मिखाईल आणि मुलगी ओल्गा. मिखाईल दहा वर्षांचा होता आणि ओल्गा नऊ वर्षांची होती.

घरापाशी उंच, फांद्या पसरलेले चिनाराचे झाड होते.

"झाडावर आपण झोपाळा बांधू या," मिखाईल म्हणाला.

"अय्या, किती मज्जा येईल झोके घ्यायला!" ओल्गा आनंदून म्हणाली.

मिखाईल झाडावर चढला आणि फांद्यांना त्याने दोरी बांधली.

मिखाईल आणि ओल्गा झोपाळ्यावर उभे राहून जोरजोरात झोके घेऊ लागली.

मुले झोके घेत होती, तेवढ्यात एक निळी पक्षीण त्यांच्यापाशी येऊन गाणे म्हणू लागली. मिखाईल म्हणाला:

"आपण झोके घेतोय म्हणून निळ्या पक्षिणीलासुद्धा आनंद झालाय!"

ओल्गाने झाडावर नजर टाकली तेव्हा तिला बुंध्यामध्ये एक छोटी ढोली दिसली आणि त्या ढोलीत पक्षिणीची छोटी पिले होती.

"निळी पक्षीण आनंदात नाही, ती रडतेय!" ओल्गा म्हणाली.

"का बरं ती रडतेय?" मिखाईलला आश्चर्य वाटले.

"का रडतेय ह्याचा विचार कर," ओल्गा म्हणाली.

झोपाळ्यावरून मिखाईलने खाली उडी मारली, पक्षिणीचे घरटे त्याने पाहिले आणि तो विचार करू लागला: पक्षीण का रडतेय?

# अमर चिनार

रस्त्यावर एक खूप खूप जुने चिनाराचे झाड उभे आहे. हिवाळयात त्याच्या सुक्या फांद्यांचा भयानक आवाज येतो आणि वसंतामध्ये चिनाराला हिरव्या पानांची सुंदर पालवी फुटते. आठवण आहे तेव्हापासून एखाद्या पहारेकऱ्याप्रमाणे तो चिनार उभा आहे. मी आईला विचारतो:

"आपला चिनार किती वर्षांचा? कुणी लावलं हे झाड?"

"माहीत नाही," आई उत्तरते. "आठवतं तेव्हापासून तो रस्त्यावर उभा आहे."

मी आजोबांना विचारतो:

"आजोबा, मला सांगा, आपल्या चिनाराचं वय काय? कुणी लावला त्याला?"

"माहीत नाही," आजोबा उत्तरतात. "नेहमी तो रस्त्यावर उभा होता. स्वतः वाढतो आणि सगळयांना आनंद देतो. भल्या माणसानं हा चिनार लावला. आठवतं मला, जेव्हा मी लहान पोरगा होतो, तेव्हा त्याच्याखाली खेळत होतो. आणि तुझी आई मैत्रिणींबरोबर वेण्या माळत त्याच्याखाली बसायची आणि आता तू त्याच्या सावलीत खेळतो आहेस!"



# मुंगीची चिकाटी

छोटी काळी मुंगी धावत चालली होती. घरी जायची तिला घाई झाली होती. स्वतःच्या बाळांसाठी पॉपीच्या फुलाची बारीक बी घेऊन जात होती. अचानक वाटेत तिला दिसली भोपळ्याची बी. जास्त मोठी, गोड, सुवासिक. मुंगीने पॉपीची बी बाजूला ठेवली व भोपळ्याची बी पाठीवर उचलली. पण तिला तोल सावरणे जमले नाही. भोपळ्याची बी खाली पडली. मुंगीने परत बी पाठीवर ठेवली. पण पुन्हा बी खाली कोसळली. मुंगीने अनेक वेळा बी वर उचलली, पण प्रत्येक वेळी ती खाली पडत होती.

अचानक कुणाचेतरी खुसूखुसू हसणे मुंगीच्या कानांवर पडले.

मुंगीने सभोवती पाहिले : वाटेवर एक लांबोळका कीटक बसला होता.

"हजार वेळा तू बी वर उचललीस," कीटक मुंगीला म्हणाला. "अजून तुला कंटाळा कसा आला नाही? तुला बी उचलून नेणं मुळीच जमणार नाही. सोडून दे तिचा नाद."

"ज्याला पराभव झाला असं वाटतं, त्यालाच फक्त जमत नाही!" मुंगी उत्तरली.

पुन्हा तिने भोपळ्याची बी उचलली. बी उचलून पाठीवर ठेवली आणि घरापर्यंत वाहून नेली. परत बी खाली पडली नाही.

अशी आहे मुंगीची चिकाटी!

# माझी आई सर्वात सुंदर !

एका वटवाघुळ मादीला एक पिलू होते. मोठ्ठे, भुऱ्या पंखांचे. मोठ्ठ्या डोळ्यांचे आणि मोठ्ठ्या तोंडाचे.

वटवाघुळे फक्त रात्रीची उडतात. तेजस्वी सूर्याला ती घाबरतात. मादीने स्वतःच्या पिलाला शिकविले :

"ढोलीमधून दिवसा बाहेर उडू नकोस. सूर्यामुळं तू आंधळा होशील. घराची वाट चुकशील."

वटवाघुळाचे पिलू आज्ञाधारक नव्हते. ते ढोलीतून बाहेर पडले, त्याने डोळे किलकिले केले आणि कुरणापलिकडे ते उडत गेले. तेथे त्याने डोळे उघडले, सूर्याकडे पाहिले आणि ते आंधळे बनले. गवतावर बसून ते रडू लागले. जवळून एक बगळा जात होता.

"तू कुणाचा?" बगळ्याने वटवाघळाच्या पिलाला विचारले.

"मी वटवाघुळाचं पिलू. माझी आई वटवाघुळ. मला काहीही दिसत नाही. मला माझ्या आईकडं घेऊन जा."

"तुझी आई कशी आहे?"

"माझी आई जगात सर्वात सुंदर आहे. तिचे डोळे खूप प्रेमळ, दयाळू, नाजुक आहेत. तसे दुसऱ्या कुणाचेही डोळे नाहीत, फक्त माझ्या आईचे आहेत!"



# छोटा चिमणा आणि आग

म्हाताऱ्या चिमणीने अखेरीस स्वतःच्या छोटया चिमण्याला घरटयाबाहेर उडायची परवानगी दिली. छोटा चिमणा आपल्या आईभोवती चिवचिवत तिला नाना तऱ्हेचे प्रश्न विचारत होता: "हे काय? आणि ह्याला काय म्हणतात?"

जमीन, गवत, झाड, कोंबडया, हंस पक्षी, तळे इत्यादींची चिमणीने आपल्या बाळाला ओळख करून दिली. तेवढयात छोटया चिमण्याचे आकाशातल्या आगीच्या प्रचंड गोळयाकडे लक्ष गेले व त्याने विचारले:

"हे काय आहे?"

"तो सूर्य," चिमणीने उत्तर दिले.

"सूर्य म्हणजे काय?" छोटया चिमण्याने चिकाटीने विचारले.

"कशाला हवी तुला ही माहिती?" शहाणी चिमणी खेकसून म्हणाली. "ती आग आहे."

"आग म्हणजे काय ते मला माहीत करून घ्यायचंय!" छोटा चिमणा चिवचिवला आणि उंच उंच उडत सूर्याच्या दिशेने जाऊ लागला.

तो एवढया वरपर्यंत उडत गेला, की शेवटी त्याच्या पंखांवरची निमुळती पिसे भाजली. घाबरून तो परत खाली आला. त्याची आई बिचारी अर्धमेली झाली होती.

"आता मला समजलं – आग म्हणजे काय!" छोटा चिमणा म्हणाला.



# आळशी माणूस आणि सूर्य

उन्हाळयातील एका खूप उकाड्याच्या दिवशी आळशी माणूस जंगलात गेला. मैदानातील सावलीच्या जागी तो आडवा झाला व मऊ गवतावर गाढ झोपून गेला. तो झोपला होता तोवर सूर्याने आकाशामधील बरीच वाटचाल केली होती व तो बरोबर माथ्यावर आला होता. मैदानावर सूर्याची किरणे तळपू लागली. आळशी माणसाच्या डोक्याला आणि पायांना तापल्या उन्हाचे चटके बसू लागले. उठून थंडगार सावलीत जाण्याची त्याला इच्छा झाली होती. पण उठायचा आळस होता.

आळशी माणूस सूर्याला म्हणतो:

"लाडक्या सूर्या, थोडासा पलिकडे सरक. मला खूप उकडतंय."

सूर्य खदखदा हसला.

"सूर्य आळशी माणसाच्या इच्छेप्रमाणं फिरतो, असं कधी घडलंय?"

आळशी माणूस चिडला व ओरडला:

"म्हणजे तू बाजूला सरकणार नाहीस?"

"मुळीच नाही!" सूर्य उत्तरला.

"अस्सं," आळशी माणूस म्हणाला. "तर मग तुझ्यावर सूड म्हणून मी इथंच निजून राहणार!"



# गाणारे पीस

पाणलावा पक्षी फार अद्भुत आहे. तो गातो... तो कसा गातो असे वाटते तुम्हाला, मुलांनो? तो पंखाने गातो. त्याच्या पंखामध्ये एक खास गाणारे पीस आहे. उडत असताना जेव्हा पाणलाव्याला गाण्याची इच्छा होते, तेव्हा तो अशा रीतीने पंख पसरतो की, गाणारे पीस कंपायमान होऊन गाणे गाऊ लागते. कशाशीही तुलना होऊ शकणार नाही अशी सूक्ष्म शीळ वाजू लागते. व्हायोलिनच्या तारेवर हळूच धनुकली फिरवली म्हणजे जसा आवाज निघतो अथवा सडपातळ लव्हाळ्यामधून वारा घुमू लागतो, तसे पाणलाव्या पक्ष्याचे गाणे भासते.

पण एकदा संकट कोसळले. पाणलाव्याने आपले पाणारे पीस हरवले. पंखामधून ते निसटले आणि जमिनीवर पडले... पाणलाव्याला गाण्याची इच्छा जेव्हा झाली, तेव्हा गाणारे पीस नव्हते.

छोटा मुलगा सेर्योझा ह्याला पाणलाव्याचे गाणारे पीस सापडले. त्याने ते पीस उचलले व तो धावू लागला – आणि पीस गाणे म्हणू लागले! पाणलाव्याने स्वतःच्या मालकीच्या पिसाचे गाणे ऐकले व तो उडत उडत मुलापाशी येऊन म्हणाला:

"मुला, माझं गाणारं पीस मला दे. गाण्याशिवाय मला जगणं अशक्य आहे."

सेर्योझा चकित झाला. त्याने पाणलाव्याला गाणारे पीस दिले.

त्या छोट्या सेर्योझामधून मोठा वाढलेला माणूस जगात खूप वर्षे जगला. अनेक वेळा जेव्हा त्याला पाणलाव्याची आठवण येई, तेव्हा त्याच्या मनात विचार यायचा: प्रत्येक माणसापाशी स्वतःचे गाणारे पीस आहे, ज्याच्याजवळ गाणारे पीस नाही, तो अभागी!

**В. Сухомлинский**
ПОЮЩЕЕ ПЕРЫШКО
*на языке маратхи*

**Vasily Sukhomlinsky**
**THE SINGING FEATHER**
*in Marathi*


सोविएत संघात मुद्रित

ISBN 5-05-000238-9

